# ज्ञानेश्वरीचें अंतरंग

बाराव्या शतकांत हेमाद्री पंडित (हेमाडपंत) हा रामदेवराय यादवांचा प्रधान मंत्री (श्रीकरणाधिप) होता. ‘बिनचुन्याच्या इमारती’ आणि ‘मोडी लिपी’ हें अनन्य-साधारण विशेष महाराष्ट्राला त्याच्यामुळेंच प्राप्त झाले. रामदेवराय आणि हेमाद्री पंडित दोघांनीहि महाराष्ट्र भाषेला फार उत्तेजन दिलें.

याच कालखण्डांत महानुभावांनी महाराष्ट्र भाषेचा सर्वभावें आणि मनोभावें स्वीकार करून सर्वांगांनी तिचें अतिशय संवर्धन केलें. महानुभाव वाङ्मयांतील ‘‘पूजावसर’’या ग्रंथाचा ‘प्राचीन मराठी गद्य शैलीचा एक नमुना’ असा उल्लेख केला जातो. महदायिसा इचें ‘धवळे’ म्हणजे मराठीचें एक अनुपम प्राचीन लेणें आहें. गोडवा आणि रसाळपणा हीं महदायिसाच्या काव्य-रचनेंतील प्रमुख वैशिष्ठ्यें आहेत. आपला आशय आटोपशीरपणें आणि ओघवती शैलीनें महदायिसा मांडते.

आतां ज्ञानदेवांच्याकडे पाहूं जातां एक अनुपम्य तेज अखिल विश्व घवळीत आहे आणि आपण अवाक्

होऊन पहात आहोत, असे वाटतें. जीवनाचें असें एकहि क्षेत्र नाही कीं, ज्याला ज्ञानदेव या परिसाचा स्पर्श झाला तरी त्याचें सोनें झालें नाहीं. ज्ञानदेव हा महाराष्ट्रांतील ‘न भूतो न भविष्यति’ असा चमत्कार आहे. महानुभावांनी संगोपन व संवर्धन केलेल्या मराठीला ज्ञानदेवांनी एवढी वैभवसंपन्न केली कीं, तिने कीर्तीचें अत्युच्य गौरीशंकर गाठलें.

ज्ञानदेवासारखा महामानव निर्माण करून नाथ संप्रदायाने भारतीय साधनेच्या इतिहासांत आपलें नांव चिरस्थायी करून ठेवले आहे. महाराष्ट्रीय पारमार्थिक साधनेच्या इतिहासाचा शुभारंभच मुळीं ज्ञानदेवांच्यापासून झाला. या दृष्टीने त्यांना युगपुरूष म्हणावयास हवे आहे. या इतिहासांत त्यांचें नांव सुवर्णाक्षरांनी नोंदवावे लागेल. अध्यात्म विचार आणि वाङ्मय या दोन्ही दृष्टींनी ज्ञानदेवी या ग्रंथाची पराकाष्ठेची महनीयता दिसून येते. ९ हजार ओव्यांची ही पुष्करणी अगणित नवतेने न्हाऊन निघाली आहे. ज्ञानदेवी म्हणजे लेखकाच्या अध्यात्मिक अनुभवाचा आणि व्यक्तित्त्वाचा एक गहिरा आविष्कार आहे. ‘या सम हा’ अशा कोटींतील हा अमोलिक ग्रंथ म्हणजे मराठी शब्दसृष्टींतील अभूतपूर्व कोरीव लेणें आहें. ज्ञानदेवांनी सर्वार्थाने भागवत धर्म-मंदिराचा भक्कम पाया घातला. ज्ञानदेव समकालीन आणि नंतर झालेल्या

संतांनी पुनीत केलेल्या या वाङ्मयीन सृष्टीचें दर्शन खचीत अंतरंग हेलावून टाकणारे आहें. एकनाथ झाले नसते तर ज्ञानदेव व ज्ञानदेवी या दोन्ही अमोलिक रत्नांना आपण कायमचे मुकलो असतो. ज्ञानदेवांचें लोकोत्तर व्यक्तिमत्त्व, त्यांची असामान्य प्रतिभा, अलौकिक बुद्धिमत्ता, अद्वितीय वाङ्मय संपदा याविषयीं मुक्त कंठाने गुणगान करणाऱ्या असंख्य अभ्यासकांनी ज्ञानदेवांचें स्थान जसे कालदृष्टीनें पहिले तसे गुण-दृष्टीनेहि पहिले ठरविले आहे. या संतश्रेष्ठाकडे एक मोठा वर्ग केवळ एक अभिजात कवि आणि साहित्यिक म्हणूनच पहात नाही तर अध्यात्म क्षेत्रांतील सिद्धप्रज्ञ मार्गदर्शक म्हणून पाहतो. महानुभावांनी कर्त्यासवरत्या बनविलेल्या मराठीच्या वाढत्या प्रपंच्याचा जोरदार पुरस्कार करून अध्यात्मासारख्या चिकित्सक विषयाला पेलण्याइतपत ज्ञानदेवांनी मराठीला प्रगल्भ बनविली. वेदान्ताला लालित्याची जोड दिली. आणि संस्कृतांतून उत्क्रान्त होत आलेल्या ओवी छन्दाला ज्ञानेश्वरींत अमर करून कीर्तिमंदिराचा कळस चढविला.

ज्ञानेश्वरी म्हणजे पूर्णता नव्हें, ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, चांगदेव पासष्टी ही सर्व चुणुक आहे. नवयुगाचें हें सूतोवाच आहे. ज्ञानदेवाशीं कमालीचे एकरूप होऊन (गीतेच्या ७०० श्लोकावर ९ हजार

ओव्या म्हणजे कांहींच नाही) आजच्या काळाला अनुरूप अशा ९० हजार ओव्या किंवा तत्सम कांहीं तयार करावे लागेल. तेव्हांच ज्ञानदेवांच्या ऋणांतून आपण कांहीं अंशीं उतराई झालो असे होईल.

कवि मानस to the point कधीच नसतें. त्याचा एक मुक्तछन्द असतो. यामुळें कांहीं त्रुटी राहून जातात. उदाहरणार्थ ''प्रतिपदीं झाडा देईन'' अथवा''पदाची कोर न सांडिता''याबाबत ज्ञानेश्वरींत आनंदी आनंद आहे. उलट 'प्रतिपदी' म्हणत असताना संपूर्ण श्लोकच सुटून गेला आहे. ज्ञानेश्वरींत अशा भाष्यदृष्ट्या कितीतरी उणीवा असूनहि ज्ञानेश्वरीच्या श्रेष्ठतेला त्यामुळें लेशमात्रहि उणेपण आलेलें नाही, हा ज्ञानेश्वरीचा खरोखर विशेष आहे.

गीतेप्रमाणें १८ अध्यायांत विभागलेला हा ग्रंथ अक्षरश: दिव्यत्वाचा अक्षय ठेवा आहे. या गीतेच्या संदर्भांत, केवळ महाराष्ट्रांतच नव्हें, तर संपूर्ण भरतखण्डांत, तिच्यावरील विविध भाषेंतील हजारो भाष्यांत ज्ञानदेवांचें स्थान एकमेवाद्वितीय आहे, यांत मुळीसुद्धा संशय नाही. (एकं एव अद्धितीयम्)

स्वर्गीच्या देवांनाहि हेवा वाटावा असे हें महाराष्ट्राचें भाग्य आहें.

ज्ञानेश्वरींत अंतरंगाचा पूर्ण प्रसाद आणि वाक्चातुर्याची सीमा आहे. एवढे मोठे कार्य दुसऱ्या कोणत्याहि धर्मसंस्थापकाने इतक्या अल्पावकाशांत केलेलें नाहीं. लक्षावधी लोकांच्या हृदयांत आत्मसुखाची शीतलता निर्माण करणारा दैदिप्यमान हिरा हें महाराष्टाचें आणि मराठी भाषेचें चिरकालीनचें परम ऐश्वर्य आहे.

कालिदासाची उपमा, भारवीचें अर्थगौरव, दंडीचें पदलालित्य हे संस्कृत साहित्यांतील तिन्हीहि गुण ज्ञानदेवांच्या दिव्य वाणींत प्रकर्षानें प्रकट झाले आहेत. कवित्वाच्या ओघाबरोबर अचूक सिद्धान्त गळीं उतरविण्याचें त्यांचें कौशल्य अत्यद्भूत आहे. जी जी ओवी समोर येते ती ती द्राक्षपाक! कठोरता कोठेच नाही. तोण्डांत कानांत पडल्याबरोबर समाधान! प्रेम, प्रसाद आणि प्रतिभा यांचा रम्य संयोग ज्ञानदेवांच्या वाणींत झाला आहे.

“ विश्वाच्या वाङ्मयांत ज्ञानेश्वरीसारखा सर्वांगसुंदर ग्रंथ झालाच नाही.”

ज्ञानदेवांचे अवलोकन स्वत:सिद्धपणें इतके व्यापक होते कीं, त्यांना तपशीलवार पढिक अध्ययनाची आवश्यकता पडली असावी असें मानता येत नाहीं.

त्यांचा अभ्यास समान्यपणे अतिशय विस्तृत होता ही गोष्ट खरी, तरी त्यांचा दृष्टिक्षेप अतिशय खोल होता हीच खरी महत्वाची गोष्ट आहे. विशाल आणि खोल दृष्टिक्षेप असणाऱ्या व्यक्तीला फारच थोड्या अभ्यासांत एकंदर सर्व विषयांचें अध्ययन होत असतें.

वैदिक, संस्कृत, आणि प्राकृत या तिन्ही सहज आणि कृत्रिम वळणानंतरची ज्ञानेश्वरीची ही संपन्न भाषा आहे. यांत कितीप्रकारचा गुणमेळ साधला आहे ते पहा—

संस्कृतांतील अर्थसामर्थ्य
१ आणि
प्राकृतांतील स्वरमाधुर्य

ज्ञानदेव पूर्वकालीन मराठीची नवोदितता
२ आणि
ज्ञानदेवकालीन मराठीचें तारूण्य

नागर मराठीचा भारदस्तपणा
३ आणि
ग्रामीण मराठीची सुलभता

गद्यांतील ओघ
४ आणि
पद्यांतील गोडी

ब्रह्मसिद्धान्त प्रतिपादनांतील प्रेरकता
५ आणि
काव्यसरणींतील रसाळपणा

सामान्य व्यवहारांतील प्रत्यक्षता
६ आणि
कविसृष्टींतील काल्पनिकता

मानवसृष्टींतील परिचायकता
७ आणि
वनस्पती व प्राणी सृष्टींतील कौतुक

सिद्धान्त प्रतिपादनांतील अधिकार
८ आणि
सद्गुरू संतापुढे सांगण्याच्या भूमिकेंतील शालीनता

गीतेला अनुसरून टीका म्हणून मर्यादा
९ आणि
स्वतंत्र विचार प्रतिभेंतील मुक्तता

व्याख्यानांतील वक्तृत्व
१० आणि
ग्रंथलेखनांतील मोजकेपणा

सिद्धान्त प्रतिपादनांतील तेज
११ आणि
भक्ताची सहज वादविमुखता

विश्वाविषयीं करूणा
१२ आणि
ज्ञानसिद्धीचें ऐश्वर्य

अशा सर्वतऱ्हेचा गुणमय मेळ साधलेला ज्ञानेश्वरीच्या भाषेंत दिसून येतो. या दृष्टीनें ज्ञानेश्वरीची भाषा केवळ अद्वितीयच मानावी लागेल. याशिवाय गीतेवरील भारतीय भाषेंतील अनेकविध टीका आणि भाष्यें यामध्यें ज्ञानेश्वरीइतके यश कोणालाहि लाभले नाही. मूळ गीतेप्रमाणे फक्त ज्ञानेश्वरीच ‘धर्मग्रंथ’ या पदवीला पोचूं शकली. (धर्म कीर्तन हें सिद्धी गेले।) गीतेवरील इतरांचें लेखन शिक्षण ग्रंथासारखे प्रबंध-स्वरूप झालें. मात्र ज्ञानेश्वरी ही जणूं मूळ गीताच मराठीच्या वैभवशाली वसनांत आणि बृहद्रूपांत पुढे येत आहे, अशी स्थिती प्राप्त झाली.

गीतेला ज्ञानदेवासारखा उपजत कवि आणि साहित्यिक प्रकृतीचा भाष्यकार मिळाल्यामुळें वेदान्ताचा तोपावेतों जो रूक्षतेशी संबंध होता, त्याला तिलांजली मिळाली. ज्ञानदेवांच्यामुळें वेदान्ताचा माधुर्याशी संबंध प्रस्थापित झाला. विदग्ध वाङ्मयांतील वैषयिकता काढून टाकून स्थिर शांतरसाची प्रस्थापना करण्यांत ज्ञानदेवांनी मराठी भाषेवर अपरंपार उपकार केले आहेत.

स्थिर शांतरस म्हणजे चित्ताची अक्षोभ अवस्था अर्थात् चित्ताची प्रसन्नता. या प्रसन्नतेमुळें, या प्रसादामुळें जीवनांतील विषाद समूळ नष्ट होतो. ''प्रसादे सर्व दु:खानां हानि रस्योपजायते। प्रसन्न चेतसो ह्याशु: बुद्धि: पर्यवतिष्ठते।। नास्ति बुद्धि: अयुक्तस्य नचायुक्तस्य भावना नचाभावयत: शान्ति:। असा हा शांतरस विषयसंबंधाचा वासनेशीं, शृंगाराशीं, भोगवादाशीं जो संबंध असतो तो नष्ट करून मन:प्रान्तांत काव्याचें अवतरण घडवितो आणि याचा परिणाम म्हणजे जीवनांत रसिकतेचा अरूणोदय होतो. दुसऱ्या शब्दांत जीवन साफल्याच्या परतत्त्वाच्या सूर्योदयाचा शुभारंभ म्हणून प्राप्त होणारी 'रसिकता' ही अरूणप्रभा आहे. याचा अंतीम परिपाक जीवन सामरस्यांत होतो.

वाचे बरवे कवित्व। कवित्वीं बरवे रसिकत्व।। ज्याच्या जीवनांत काव्य अवतरत नाही, म्हणजे ज्याची वाच्या काव्य प्रसवत नाहीं ती वांझ

समजावी कारण तिच्यामध्यें गोडवा नाहीं, माधुर्य नाहीं, जीवनाची रहस्यमयता सूचित करण्याची क्षमता नाहीं.

जीवाच्या व्यावहारिक आजीविकेला ती ठीक आहे. ''कवित्वीं बरवे रसिकत्व'' बुद्धींत, मनांत, वाचेंत काव्य नसेल तर रसिकत्व औषधालाहि मिळायचे नाहीं. रसिकता हा शुद्ध अंत:करणाचा धर्म आहे. भोगी रसिक असतो हें समीकरण सर्वथा चूक आहे. भोगी केवळ भोगलोलुप असतो.

त्यागात् शान्ति: अनंतरम्। असे गीता म्हणते. महाराज म्हणतात 'भोगी झाला त्याग। गीतीं गाता पांडुरंग।। ज्ञानदेव म्हणतात 'हे शब्देविण संवादीजे' तेच नंतर 'बोली अरूपाचें रूप दावीन' असे म्हणतात. हे सगळे संदर्भ भिन्न असले तरी त्यांत एकच तत्त्व अनुस्यूत आहे.

रसिकत्वीं परतत्त्वाविषयीं ज्ञानदेव सांगतात. वास्तवांत 'कवि' या संज्ञेतच हे सर्व अंतर्भूत आहे. कवि शब्दाची निरूक्तिच मुळी क्रान्तदर्शी अशी आहे. देह, मन, बुद्धीच्या पलीकडचे पहाणारा असा क्रान्तदर्शीचा अर्थ आहे. ईशावास्य म्हणते,

कविः मनीषि परिभूः स्वयंभूः याथातथ्यतः अर्थान् व्यदधात् शाश्वतीभ्यः समाभ्यः ।। याचा सरळ अर्थ—कवि हा मनाचा मालक, विश्वप्रेमाने भरलेला, आत्मनिष्ठ, यथार्थ भाषी आणि शाश्वत काळावर नजर देणारा असतो.

रसिकतेचा अरूणोदय झाल्यावर त्याचा अंतीम परिपाक सामरस्याच्या सूर्योदयांत होतो. हें सामरस्य परतत्त्वाच्या अनुभवांतून प्राप्त होते.

दुसरें असे कीं, शान्तु शृंगारातें जिये अथवा शांतरस शृंगाराच्या माथ्यावर पाय ठेवतो असे ज्ञानदेव म्हणतात. हा शांतरस लौकिकांतील म्हणजे काव्य साहित्यांतील मुळीच नाही हे अगोदर ध्यानीं घ्यावे. ज्ञानेश्वरींत लौकिक अर्थ आहेत. मात्र केवळ लौकिकार्थासाठीं ज्ञानेश्वरी नाही. यासाठीं कालिदास जगन्नाथ, तांबे, केशवसुत आदि शेकडो कवि आहेत रा.शं.वाळिंबे यांनी,'ज्ञानेश्वरींतील विदग्ध रसवृत्ति' या ग्रन्थांत 'कविपोषका' इत्यादि शब्दांचा आधार घेऊन जे परिश्रम घेतले ते मन थक्क करणारे आहेत. मात्र त्यांतून त्यांनी निष्कर्ष चुकीचा काढला आहे. त्यांना अध्यात्म, आत्मानुभव अशा गोष्टींशीं कांहीं कर्तव्य नाही. त्यांची ही इहवादी दृष्टि अनर्थकारी आहे. ज्ञानदेव म्हणतात, हें बोलाचे,याचा अर्थ तें इहवादी नाही असा आहे—नोहें

शास्त्र। पै संसारू जीणते शस्त्र। —म्हणजे संसाराचा उपशम. म्हणजेच हें असतचि सरे। ऐसे वर्म आहे बा रे।। पुढे ते म्हणतात, आत्मा अवतरविते मंत्र अक्षरें इयें. या ऐंद्रिय सृष्टीच्या पलीकडे जे अलौकिक आहे जे मन बुद्धीच्या कक्षेंतील कधीच नसते, त्याच्या अनुभवासाठीं एक नकारात्मक साधना पद्धति सांगणारी गीता आणि ज्ञानेश्वरी आहे. ‘नामा म्हणे ग्रंथ श्रेष्ठ ज्ञानेश्वरी। एक तरी ओवी अनुभवावी।। त्याची दिशा ही अशी आहे.

‘एकतरी ओवी अनुभवावी’ याचा एक कार्यक्रम आम्ही करून ठेवला आहे. हेच नामदेव म्हणतात, ‘अमृताहूनि गोड नाम तुझें देवा। मन माझें केशवा कां बा नेघे?’ त्यांच्याच भाषेंत बोलायचे झाल्यास असे म्हणावे लागेल कीं, ‘ज्ञानदेवी हा श्रेष्ठ ग्रंथ आहे. माझ्या मनाला एक तरी ओवी अनुभवावी असे कां बरे वाटत नाही?’ ध्येय विधायक असेल तर साधन नकारात्मक असते. ब्रह्मप्राप्ती विधायक असल्यामुळें त्याचें साधन अद्वैत हें नकारात्मक आहें. सत्य हें विधायक असल्यामुळें त्याचें साधन अहिंसा ही नकारात्मक आहे. स्वास्थ्य विधायक असल्यामुळें त्याचें साधन व्याधी-निवारण हें नकारात्मक आहें.

शांतरस म्हणजे चित्ताची क्षोभरहित अवस्था

कामात् क्रोधः अभिजायते। असे गीता म्हणते. येथे क्रोध

याचा अर्थ क्षोभ असाच आहे. आचार्य म्हणतात‘कामात्कुतश्चित् प्रतिहतात् क्रोध:अभिजायते काम हा प्रत्येक वेळीं अवरूद्ध होतोच असे नाही. तो प्रतिहत झाला नाही तर मग क्रोध कसा निर्माण होईल? आणि येथे क्रोध तर अवश्यंभावी आहे. खरी स्थिती अशी आहे कीं, कामना उत्पन्न झाली कीं, चित्ताची शांत अवस्था नष्ट होऊन त्यांत क्षोभ निर्माण होतो. त्यालाच क्रोध म्हटले जाते. क्रोध हा कामाहून वेगळा नाही. कामाचीच ती पुढील अवस्था आहे.‘‘काम एष: क्रोध एष: रजोगुण समुद्भव:। अ०३ जो काम तोच क्रोध असे गीता स्वत:च खुलासा करते म्हणून शंकेला जागा रहात नाही. मी हे ज्ञानदेवांच्या शांत रसाचें स्पष्टीकरण करतो आहे. शृंगााराच्या माथ्यावर पाय ठेवणारा शांतरस हा शृंगारविरोधी मानला गेला आहे—अनेक लोकांनी. कारण हा शांतरस काव्य साहित्यांतील आहे अशी त्यांची भोळी समजूत आहे. ग्रन्थांत केवळ शब्द असतात, अर्थ जीवनांत असतो. पुस्तकांत ‘घोडा’ असा नुसता शब्द असतो मात्र त्याचा अर्थ तबेल्यांत गेल्यावर कळतो. अभ्यास करून ज्ञानेश्वरी कधीच कळणार नाही. तुम्ही भाषाप्रभू व्हाल एवढाच फायदा. आजची कीर्तनें प्रवचनें मनाची केवळ सांत्वना झालेली आहेत—स्वत:च्या आणि दुसऱ्यांच्या ज्ञानेश्वरी जीवन जगल्याशिवाय कळणार नाही. मात्र जीवनाला सगळे बगल देऊन

चाललेत. मठामंदिरांत आम्ही शांती समाधानाच्या शोधासाठीं जातो. ही सुखाची लालसा आहे. गीता म्हणते,''नसे दु:खांत उद्वेग। सुखाची लालसा नसे।।याच्या उलट आम्ही वागतो. फक्त चेहरे बदलतो, मुखवटे बदलतो, केवळ कार्यक्रम बदलतो, आमच्यांत कांहींच बदल होत नाही. परमार्थी असल्याचा आम्हांस निव्वळ भ्रम आहे. इतरासारखेच आम्ही अगदी शंभरटक्के सांसारिक आहोत. इतरापेक्षां आमचे कार्यक्रम जास्त सोफेस्टिकेटेड असल्यामुळें इतराहून आम्ही वेगळे निराळे आहोत अशा गोड समजुतींत आयुष्य व्यर्थ घालवतो. अजूनहि वेळ गेलेली नाही.'एकतरी ओवी अनुभवावी' याचा खरा अर्थ ध्यानीं घ्यावा.

रागद्वेषवियुक्तैस्तु विषयान् इन्द्रियैश्चरन् । विषय-सेवन अथवा विषयत्याग या दोन्हींची इच्छा प्रारब्धाधीन आहे. मात्र त्यांतील कामना अथवा वासना अज्ञानजन्य आहे. तेच वरील श्लोकचरणांत सांगितले आहे. ''आपूर्यमाणं अपि अचलं प्रतिष्ठं समुद्रं यद्वत् आप: प्रविशन्ति तद्वत् सर्वे कामा: (विषयोपभोग) यं प्रविशन्ति स: शांतिं आप्नोति कामकामी न ।। कामकामी म्हणजे भोगलुब्ध.

न भंग पावे भरताहि नित्य
समुद्र घेतो जिरवूनी पाणी
जाती तसे ज्यांत जिरूनी भोग
तो पावला शांती, न भोगलुब्ध

शांती ही अक्षोभ अवस्था आहे. म्हणजे चित्ताची प्रसन्नता. रामायणांत एक श्लोक आहे—

अकर्दमम् इदं तीर्थम् भारद्वाज निशामय।
रमणीयं प्रसन्नं च सज्जनानां मनोयथा।।

प्रसन्नतेंत निर्मलता (अकर्दम) असतेच. जसे सिंव्हगडावरील देवटाक्याचें पाणी. गदळ नसलेलें (अकर्दम). इतके निर्मल कीं, त्यांत वरून खडा टाका, तळापर्यन्तचा त्याचा प्रवास अगदी स्पष्ट दिसतो. ज्ञानेश्वरीला खाली ओढूं नका. ज्ञानेश्वरीच्या अभ्यासकाला ज्ञानदेव कधीच हातीं येणार नाहीत. ज्ञानेश्वरी जगूनच ज्ञानदेव कळतील. आमच्या जीवनाशीं ज्ञानदेवांचा कांहींच संबंध नाही. वाचेंत, मनांत, बुद्धींत त्यांना साठविले आहे. जीवनांत त्यांना स्थान आहे कां? बारकाईनें पहा. गीतेविषयीं मला झोपेंतून उठवून विचारा, अचूक उत्तर देईन. ही सर्कशीसारखी कसरत आहे. अशा अभ्यासाची एकदां का नशा चढली कीं,

आजीविका अतिशय उत्तम चालतें. गीतेसारखा विषय असल्यामुळें समाजांत मानमरातब असतो, लोक फार मान देतांत. आजची वस्तुस्थिती डोळे उघडे आणि डोके ताळ्यावर ठेऊन पहाल तर पुराणकार, कीर्तनकार, प्रवचनकार, हरदास, व्याख्यातें अथवा माझ्या सारखे लेख लिहिणारे, झाडून सगळे याच चौकटींत बसतात. सावध होणे फार जरूरीचे आहे.

ज्ञानदेवांची सिद्धप्रज्ञता—

तैसी दशेची वाट न पाहतां।
आणि वयसेचिया गांवा न येतां।
बाळपणीच सर्वज्ञता। वरी तयाते।।
तियें सिद्धप्रज्ञेचेनि लाभें।
मनचि सारस्वतें दुभे।
मग सकळ शास्त्रें स्वयंभे।
निघती मुखें।।

लहान मुलें एकेक अक्षर वाचतात. सामान्य जन शब्द आणि वाक्यें वाचतात. त्याहून श्रेष्ठ मुद्दे वाचतात. त्याहून प्रौढ जाणते विचारांचें वाचन करतात. अक्षरें, शब्द, वाक्यें, विचार, किंबहुना पृष्ठेंहि ज्या

अवस्थेंत गौण ठरतात, त्या अवस्थेला सिद्धप्रज्ञ अवस्था म्हणतात.

विस्तृत अभ्यास तसेच विशाल आणि खोल दृष्टिक्षेप असणाऱ्या पुरूषाला फारच थोड्या अभ्यासांत एकंदर सर्व विषयांचें अवलोकन होऊन जाते. ज्ञानदेवांच्या या सिद्धप्रज्ञेवर तत्कालीन परिस्थितीचा आंशिक परिणाम दिसून येतो. कसे ते पहा

रामदेवराय यादवांच्या काळांत महाराष्ट्रांत सुख-समृद्धता होती. पूर्ण राजवैभवांत हा महाराष्ट्र नांदत होता. काव्य, साहित्य, चित्र, शिल्प, स्थापत्य इत्यादि कलांची पौर्णिमा विलसत होती. साहजिकच ह्या राजवैभवाचा ज्ञानदेवांच्या भाषेवर परिणाम झालेला आहे.

ज्ञानदेवांच्या भाषेंतील वैभवी दरबारी झांक, विनम्रतेचा सराईतपणा, गौरवून बोलण्याची घटलेली धाटणी, ही पुढेपुढे मराठींतून जवळजवळ लुप्तप्राय झाली.

उपमा, भाषासौंदर्य, तत्त्वज्ञान, अद्वैतभक्ति याबरोबर अलौकिक निरीक्षण शक्ति, अप्रतिहत कवित्वशैली, अलोट वाङ्माधुर्य या सर्व गुणांच्या संमिश्रणानें

‘ज्ञानेश्वरी’ हा ग्रंथ ‘‘न भूतो न भविष्यति’’ असा होऊन राहिला आहे.

भावनांची कोमलता, कल्पनाशक्तीची उदारता, सुमधुर शब्दांची समृद्धि, रचनेची सहजता आणि सरलता हें सर्व प्रथम श्रेणींतील काव्याचे विशेष ज्ञानेश्वरींत आढळतात.

जगाच्या वाङ्मयांतील अत्युच्य श्रेणीमधील कोणत्याहि काव्याची बरोबरी करूं शकेल इतकी ज्ञानदेवांच्या भावार्थ दीपिकेची थोरवी आहे.

ज्ञानदेवांनी पारमार्थिक सत्य पटविण्यासाठीं दृष्टान्त दिले आहेत. लहान वयांतसुद्धा ज्ञानदेवांचें निरीक्षण अत्यन्त व्यापक व सूक्ष्म होतें असें दिसतें.

काव्य प्रभावशाली होण्यास प्रसाद, माधुर्य इत्यादि गुणांची आवश्यकता असते. निर्मल व शांत जलाशयांत पहाणाऱ्यास आपलें प्रतिबिंब स्पष्ट दिसतें. त्याप्रमाणें प्रासादिक ग्रन्थांत प्रतिबिंबित झालेलें प्रमेय वाचकांच्या स्पष्ट अनुभवास येतें. गहन विषय सहजसुंदर भाषेंत सांगणे हें कार्य कठीण आहें. त्यांतून प्रसाद गुणास नादमाधुर्याची जोड मिळाल्यास पाहण्यासच नको. असे उभय गुणयुक्त काव्य म्हणजे ज्ञानदेवांचाच दृष्टांत

द्यायचा तर सहजे मलयानिल मंदु सुगंधु। तया अमृताचा होय स्वादु। आणि तेथेचि जोडे नादु। दैवगत्त्या।। तरी स्पर्शे सर्वांग निववी। स्वादें जिव्हेतें नाचवी। तेवीची कानाकरवी। म्हणवी बापु माझा।। ज्ञानदेवांना असे प्रसन्नमधुर काव्य निर्माण करायचे होतें.

कित्येक वेळं ज्ञानदेवांचे दृष्टान्त एकापेक्षां एक चढते असतात. तात्त्विकदृष्टया त्यांचा फार उपयोग होतो. अशी दृष्टान्त मालिका देण्यास कवीचे सृष्टि व व्यवहार यांचें निरीक्षण व्यापक व सूक्ष्म असावे लागते. एकाच उपमानाचा वेगवेगळ्या अंशाने उपयोग करण्यांत ज्ञानदेवांचें बुद्धिवैभव प्रकट झाले आहे. ज्ञानदेवांचा अध्यात्मिक अनुभव आणि काव्यस्फूर्ति दोन्ही श्रेष्ठ कोटीची आहेत. ज्ञानदेवांच्या रूपकांची मौज अशी आहे कीं, त्यापैकी बहुतेक अध्यात्म शास्त्रांतील निरनिराळ्या अनुभवावर आधारलेली आहेत. १६व्या अध्यायाच्या आरंभीं सूर्याच्या रूपकानें केलेलें चित्सूर्याचें वर्णन पहा.उत्प्रेक्षा अलंकार तर अतिमोहक साधला आहे. कीं गीता कमळीचे भृंग। हें गीता सागर तरंग। कीं हरीचे तुरंग। गीता रथीचे।। अ०१८ ओवी १६७४.

ज्ञानदेवांच्या काव्याचा पहिला विशेष म्हणजे त्यांत दिसून येणारी निर्व्यंग आणि सुदृढ मानसिक स्थिती

त्यांच्या चरित्राला पार्थिव कोठेहि चिकटलेलें नाहीं. त्यामुळें पापी वृत्तीचा लेशहि संपूर्ण ज्ञानेश्वरींत अणुमात्र आढळत नाही. मराठी भाषेचा आणि शुद्ध परमार्थाचा गौरव करण्याकरितां ईश्वरीं तेज ज्ञानदेवांच्या देहांतून चमकून गेलें.

त्यांच्या काव्याचा दुसरा विशेष म्हणजे अलौकिक काव्यस्फूर्ति. त्यांच्या काव्यस्फूर्तीचें लोकोत्तर सामर्थ्य ज्यांना पहावयाचे असेल त्यांनी १३ व्या अध्यायांतील ‘‘अज्ञानं यततोऽन्यथा’’ या श्लोकांवरील भाष्य पहावे. तसेच ‘अहिंसा’ या पदाचें व्याख्यान पहावें.

ज्ञानदेवांचा स्वसामर्थ्याविषयीं असलेला आत्म-प्रत्यय हा त्यांच्या काव्याचा तिसरा विशेष आहे.

माझा मराठाचि बोलूं कवतिकें। परि अमृतातेंहि पैजा जिंके।। मराठीचियें नगरीं। ब्रह्मविद्येचा सुकाळु करी। देणे घेणे सुखचि वरी। हों देई या जगा।। तूं आपुलेनी स्नेहपल्लवे। मातें पांघुरसी सदैवे। तरी आतांचि हे आघवे। निर्मीन माये।।

ज्ञानदेवांची लेखन पद्धति स्वतंत्र आहे. आपला भावार्थ सहज-सुंदर रीतीनें श्रोत्यापुढे मांडण्याकडे त्यांचा

कटाक्ष आहे. तथापि ज्ञानेश्वरींत न्यायघटित शास्त्रचर्चा स्पष्टपणें नसल्यामुळें तो ग्रंथ प्राकृत जनाकरितां आहे असे मानणे चुकीचे आहे. वेदान्ताची भाषा व अर्थ पचवून भावार्थ दीपिकेंतील बोल निघाले आहेत हे लक्षांत ठेवले पाहिजे.

गीतेच्या रसमयतेचें जे वर्णन त्यांनी केले आहे ते त्यांच्या ग्रंथासहि लागू पडते.''तैसे हें नित्यनूतन देखिजे। गीतातत्त्व।।'' गीता नवनवोन्मेशशाली आहे. तशीच ज्ञानेश्वरी. तिलाहि हाच न्याय लागू होतो.प्रतिक्षण नवे रूप, नवा अर्थ, नवा आशय.

ज्ञानेश्वरीच्या ६व्या अध्यायांतील योगमार्ग हा अद्भुतरम्य आणि काव्यमय वर्णनाचा भाग आहे. तो 'नाथपंथीचा संकेतु' असल्यामुळें स्वतंत्र ग्रंथच होईल. मात्र त्याचा गीतेशीं वास्तविक संबंध नाही.

ज्ञानदेव पूर्वकालीन किती प्रकारचे विचार-प्रवाह अथवा विचारौघ ज्ञानेश्वरींमध्यें परिपाक स्वरूपांत आढळतात. ते पहा—

१ जीवनांतील अंत:स्फूर्ति —वैदिक काल.

२ जीवनांतील आदर्श —रामायण काल.

३ जीवनांतील वैविद्य व व्यवहारशास्त्र —
महाभारत काल.

४ जीवनांतील कला—अहिंसा— जैनबौद्ध काल

५ जीवनांतील तत्त्वज्ञान —आचार्य काल.

६ जीवनांतील सार्वत्रिक उपासना—भक्ति, संत काल

१—वैदिक वाङ्मयांतील अंत:स्फूर्तीचा विचार-प्रवाह ज्ञानेश्वरींत पूर्णार्थाने आत्मसात होऊन एका अपूर्व रूपांत प्रकट झाला आहे. ज्ञानदेवांचे गीतेवरील विवेचन म्हणजे गीता श्लोकांचा अन्वयार्थ लावून विचारमंथनानें केलेलें भाष्य नाही; तर संपूर्ण श्लोक अवलोकन केल्यावर त्यावर टीका करताना एकाद्या खडकाचा टवका उडून झरा उसळावा तशी त्यांची वाक्गंगा दुथडी भरून वहाते आहे असे जाणवतें. ज्ञानदेवीला शब्दार्थ ज्ञानदेवी म्हणत नाहीत. तिला भावार्थ दीपिका म्हणतात. यामुळें ‘पदाची कोर न सांडिता’ हें त्यांचें कथन शब्दार्थाने

घ्यावयाचे नाही. स्वारस्यानें घ्यावयाचे. जणूं गीता श्लोक ज्ञानदेवांच्या अंतरांत प्रतिध्वनित होतात आणि तो प्रकट झालेला प्रतिध्वनि म्हणजे ''भावार्थ दीपिका''.

वैदिक कालखंड अशा अंतःस्फूर्तीचा होता ''अनादि निधना नित्याः वागुत्सृष्टवा स्वयंभुवः'' अशा वेदवाङ्मयाचा याज्ञवल्क्यासारखा तेजस्वी द्रष्टा ऋषिवर आमच्या या महाराष्ट्र भूमींमध्यें आम्हां मराठी भाषिकासाठीं जणूं ज्ञानदेवांच्या रूपानें अवतरला. यामुळें ज्ञानदेवांच्या 'ज्ञानदेवी' या काव्यधारेला वैदिक संस्कृतीची ती पावनी गंगाच म्हणावी लागेल.

वैदिक वाङ्मय हें एक प्रातिभ-दर्शन आहें त्याच्या प्रकटीकरणासाठीं शब्द थिटे असल्यामुळें वेद छंदोमय गूढ भाषेंत अवतीर्ण झाले आहेत. ज्ञानदेवांची स्थिती उलटी आहे. त्यांना शब्दांची वाणच पडत नाही. शब्दसरस्वती हात जोडून त्यांच्यापुढें उभी आहे. शब्दांची, उपमा उत्प्रेक्षांची मुक्तपणें उधळण करणारे ज्ञानदेव अधिकारवाणीने कसे बोलतात पहा—

साचचि बोलाचें नोहें शास्त्र।
पै संसारू जीणते शस्त्र।
आत्मा अवतरविते मंत्र।
अक्षरें इये ।।

पर्वतशृंगावर बसून वैदिक मंत्रांचें सामगायन करणाऱ्या ऋषिवर्याप्रमाणें इयें मराठीचियें नगरीं ब्रह्मविद्येचें सामगान करणारा हा ऋषिवरच नाहीं काय!

इसवीसन पूर्व २० हजार वर्षांपासून १२ व्या शतकापर्यन्तच्या सर्व विचारांच्या प्रवाहांत ज्ञानदेवांनी या महाराष्ट्राला सुस्नात केले आहे.

ज्ञानगुणावर आणि दैवीसंपदेवर ज्ञानेश्वरीचा मोठा भर आहे. ही आदर्श काखण्डांतील विचारौघाची सहजावस्था आहे. हा पुढील प्रवास ज्ञानेश्वरीने केला आहे.

आचार्यांच्या पूर्वीचा जैन बौद्धांचा अहिंसेचा विचार-प्रवाह ज्ञानेश्वरींत विनय, नम्रता, शालीनता या स्वरूपांत सर्वत्रच मुरलेला आहे. याशिवाय त्यांचें अहिंसेवरील व्याख्यान म्हणजे मराठी भाषेंतील अहिंसेची सर्वोत्तम कलामय मूर्ति आहे.

ज्याप्रमाणें, फळ तेंच पण तें पिकल्यानंतर त्याची अवस्था अतिशय रसमय होऊन जातें; त्याप्रमाणें ज्ञानदेवांनी आचार्यांचें बौद्धिक तत्त्वज्ञान अत्यन्त हृदयंगम केलें आहें.

आतां संतकालीन विचार प्रवाह पहा—

ज्ञानोत्तर भक्ति हा अद्वैतानुभवच. ही अपूर्व अवस्था हे ज्ञानदेवांच्या भक्तीचें वैशिष्ठ्य आहें. त्यांची भक्ति केवळ साधनांत रहात नसून ती साध्य साधनाला व्यापून रहाणारी दिव्य भक्ति आहे.

**With Dnyanadeo the Ovi trips, it gallops, it dances, it whirls, it ambles, it thots, it run, it takes long leaps or short jumps, it halts or sweeps along, evoles a hundred and one graces of movement at the master s command. In the music of sound too it reveals a mysterious capacity of manifold evolution. The thrill quiver, the thunder, the bellow, the murmur, the grumble in fact, every shade of sound it wields when occasion demands. It is an instrument that he has only to touch, and it responds to any key high or low, and to any note and tune.**

**Unparalleled in Marathi literature, Dnyaneshvari is so exquisite, so beautiful, so highly poetic in its metaphors and comparison, similes and analogical illustrations, so perspicuous and in style, so lofty in its flights, so sublime in tone, so melodious in word-music, so in its concepts, so pure in taste…that, notwithstanding the profundity, the recondite nature of the subject, and the inevitable**

**limitations attendant upon the cirumstance that the author's main object was to make original intelligible rather that edd anything new, the reader is simply fascinated, floats rapturously on the crest of the flow, and is lost in the eadence of rhythm and the sweet insinuating harmonies till all is thanks giving and thought is net.**

**W. B. Patwardhan,**
**Wilson Philogical Lectures,**
**Lecture III**

**Quoted by Prof. R. D. Ranade,**
**Mysticism in Maharashtra, Page 36**

ज्ञानदेवांचें ज्या ज्या वेळीं स्मरण होते त्या त्या वेळीं वाटतें, ''आई, थोर तुझे उपकार!''
''झाले बहु, आहेत बहु, होतीलहि बहु, परि यासम हाच'' ज्ञानदेवांचें या महाराष्ट्रांत असे अनन्यसाधारण स्थान आहे.

इति लेखनसीमा

आप्पा ठोंबरे.

भाद्रपद व।। त्रयोदशी

दिनांक : १२/१०/२००४